**शासकीय भुखंडाचा खाजगीकरणातून व्यापारी तत्वावर विकास करवायाच्या परिपत्रकामध्ये / धोरणामध्ये बदल / सुधारणा करुन नव्याने शासन धोरण ठरविण्यासाठी समिती गठीत करण्याबाबत...**



**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : खाक्षेस-२०२३/प्र.क्र.२२५/रस्ते-८**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : १० मे, २०२३.

**वाचा : -**

शासन परिपत्रक क्रमांक खाक्षेस-२००१/प्र.क्र.१८४/रस्ते-८, दिनांक २१.०२.२००२.

**प्रस्तावना :-**

सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अखत्यारीतील शासकीय भुखंडाचा खाजगीकरणातून व्यापारी तत्वावर विकास करण्याच्या प्रस्तावात एकरुपता आणण्याबाबतचे परिपत्रक क्रमांक खाक्षेस-२००१/प्र.क्र.१८४/रस्ते-८, दिनांक २१.०२.२००२ रोजी निर्गमित करण्यात आले आहे.

सदर परिपत्रकामध्ये शासनाच्या मालकीचा मोकळ्या भुखंडाचा खाजगीकरणातून व्यापारी तत्वावर विकास करुन शासकीय इमारती बांधून देण्याबाबतच्या मार्गदर्शक सूचना क्षेत्रीय अधिकाऱ्यांना देण्यात आल्या आहेत. तथापि, सदर परिपत्रक निर्गमित झाल्यापासून २० वर्षापेक्षा जास्त कालावधी उलटून गेला असल्याने सदर परिपत्रकामध्ये काळानुरुप बदल / सुधारणा करणे आवश्यक ठरते. तसेच, क्षेत्रीय स्तरावरील प्रकल्प कार्यान्वित करताना येणाऱ्या अडचणींचा विचार होऊन सदर परिपत्रकामध्ये सुधारणा / बदल होण्याच्या अनुषंगाने क्षेत्रीयस्तरावरुन मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, कोकण यांचा बदलाबाबतचा मुद्देनिहाय अहवाल शासनास प्राप्त झाला आहे. यासंदर्भात सार्वजनिक बांधकाम विभागाचे तसेच शासनाच्या इतर प्रशासकीय विभागाने (उदा.ग्राम विकास व परिवहन विभाग) यांच्याकडूनही सदरबाबत वेळोवेळी शासननिर्णय / परिपत्रके / धोरण निर्गमित केले आहेत. तसेच, महाराष्ट्रातील शहराचा नियोजित विकास होण्यासाठी वेळोवेळी शहरांचे विकास आराखडयामध्ये बदल झालेले आहेत.

वरील सर्व बाबींचा सर्वंकष अभ्यास करुन शासनस्तरावरुन शासकीय भुखंडाचा खाजगीकरणातून व्यापारी तत्वावर विकास करण्याच्या वरील शासन परिपत्रकामध्ये सुधारणा करणे / शासनाने नव्याने धोरण निश्चित करणे, ही बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासकीय भुखंडाचा खाजगीकरणातून व्यापारी तत्वावर विकास करावयाच्या वरील परिपत्रकामध्ये सुधारणा / बदल करणे / नव्याने धोरण निश्चित करणे हा धोरणात्मक निर्णय असल्याने शासनस्तरावरुन धोरणात्मक निर्णय घेणे आवश्यक ठरते. सदरचा निर्णय घेताना / धोरण निश्चित करण्यासाठी प्रकल्प राबविताना क्षेत्रीयस्तरावर येणाऱ्या अडचणींचा व शहराचा मंजूर विकास आराखडयातील बदलांचा तज्ज्ञ सल्लागाराकडून सर्वंकष अभ्यास होऊन त्या सर्व बाबी शासन निर्णयात / धोरणामध्ये अंतर्भुत होणे आवश्यक असल्याने व सदरचा निर्णय घेण्याबाबत शासनाला सुलभता येण्यासाठी समिती गठीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुसार खालीलप्रमाणे समिती गठीत करण्याचा निर्णय शासन घेत आहे.

**शासन निर्णय :-**

सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अखत्यारीतील शासनाच्या मालकीच्या मोकळया भुखंडाचा खाजगीकरणातून व्यापारी तत्वावर विकास करण्याबाबतचे परिपत्रक क्रमांक- खाक्षेस-२००१/प्र.क्र.१८४/रस्ते-८, दिनांक २१.०१.२००२ रोजी निर्गमित केलेल्या परिपत्रकामध्ये आवश्यक त्या सुधारणा / बदल करण्यासाठी / शासनाचे नवीन धोरण निश्चित करण्यासाठी खालीलप्रमाणे समिती गठीत करण्यात येत आहे.

**गठीत समिती**

| अ.क्र. | सदस्य | पद |
|---|---|---|
| १ | मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, मुंबई, | **अध्यक्ष** |
| २ | मुख्य वास्तुशास्त्रज्ञ, सार्वजनिक बांधकाम विभाग, महाराष्ट्र राज्य, मुंबई, | **सदस्य** |
| ३ | मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, कोकण, मुंबई, | **सदस्य** |
| ४ | मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, पुणे, | **सदस्य** |
| ५ | अधिक्षक अभियंता, मुंबई सार्वजनिक बांधकाम मंडळ, मुंबई, | **सदस्य** |
| ६ | अधिक्षक अभियंता, पुणे सार्वजनिक बांधकाम मंडळ, पुणे, | **सदस्य** |
| ७ | अधिक्षक अभियंता, ठाणे सार्वजनिक बांधकाम मंडळ, ठाणे. | **सदस्य सचिव** |

सदर समितीने यापूर्वी निर्गमित केलेले परिपत्रके / शासन निर्णय यांचा सर्वंकष अभ्यास करावा व सदरचे धोरण निश्चित करताना आराखडा मंजूर होण्याच्यादृष्टीने व शासनाच्या शहरांच्या मंजूर विकास आराखडयाच्या अनुभवी तज्ज्ञ सल्लागाराकडून सल्ला घ्यावा. जेणेकरुन योग्य व आवश्यक त्या सुधारणा / बदल करणे शक्य होईल आणि त्यानुसार सदरप्रमाणे बदल करण्याबाबतचा शासननिर्णयाचा मसुदा तयार करता येईल.

उपरोक्तअनुषंगाने आवश्यक असणारे अनुभवी तज्ज्ञ / सल्लागार यांचा सल्ला घेणे याबाबतचे अधिकार समितीच्या अध्यक्षांना देण्यात येत आहेत. तज्ज्ञ सल्लागाराची नियुक्ती समिती अध्यक्ष यांनी सार्वजनिक बांधकाम विभागाच्या प्रचलित नियमानुसार करावी व त्यासाठी अनुषंगिक फी / देयके अदा करण्यास शासन मान्यता देत आहे. समितीचे अध्यक्ष आवश्यकतेनुसार निमंत्रित सदस्य यात अंतर्भूत करू शकतील.

**समितीची कार्यकक्षा खालीलप्रमाणे असेल.**

(i) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, कोकण यांच्या सदर प्रस्तावातील मुद्दयांवर सविस्तर अभ्यास करणे.

(ii) यासंदर्भात शासनाने, शासनाच्या सार्वजनिक बांधकाम विभाग व इतर विभागाने (उदा.ग्राम विकास विभाग व परिवहन विभाग) निर्गमित केलेले शासन निर्णय / परिपत्रके / मंजूर धोरण याचा सविस्तर अभ्यास करणे.

(ii) अनुभवी व तज्ज्ञ सल्लागारांकडून शहरांच्या मंजूर विकास आराखडयांचा अभ्यास करुन त्यांनी सुधारलेल्या बाबींचा सदरच्या शासन धोरणामध्ये अंतर्भाव करण्यासाठी अभ्यास करणे.

(iv) वरील सर्व बाबींचा सर्वंकष अभ्यास करुन शासनस्तरावरुन निर्गमित करावयाच्या शासन धोरणाचा शासन निर्णयाचा मसुदा तयार करुन शासनास सादर करणे.

(v) सदर समितीचा कामकाज कालावधी ३ महिन्यांचा असेल.

**समितीने वरीलप्रमाणे अभ्यास करुन ३ महिन्यात शासनास अहवाल सादर करावा.**

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०५१०१७४७१४५२१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्र राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

NIRANJAN ARVIND TELANG

Digitally signed by NIRANJAN ARVIND TELANG
DN: c=IN, o=PUBLIC WORKS DIVISION AKLUJ, ou=EXECUTIVE ENGINEER, 2.5.4.20=c23337809ef4fbba9fe0c6544de18cd588bff051f9edff556c58b122e0d65776, postalCode=413101, st=MAHARASHTRA, serialNumber=8a19090f62fa3b97329b76be28b7acce0890866861a242bdcb38db4a1d1ce2ea, cn=NIRANJAN ARVIND TELANG
Date: 2023.05.10 17:49:01 +05'30'

**(निरंजन तेलंग)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत**

१) मा.राज्यपाल, महाराष्ट्र राज्य यांचे सचिव,

२) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई,

३) मा. मंत्री, सार्वजनिक बांधकाम, यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,

४) मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई,

५) उपाध्यक्ष तथा व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळ, मुंबई,

६) जिल्हाधिकारी, मुंबई / मुंबई उपनगरे / ठाणे / पुणे / रायगड / रत्नागिरी व सिंधुदूर्ग,

७) आयुक्त, महानगरपालिका (मुंबई / ठाणे / पुणे / कल्याण-डोंबिवली,

८) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, मुंबई / पुणे / कोकण,

९) मुख्य वास्तुशास्त्रज्ञ, सार्वजनिक बांधकाम विभाग, महाराष्ट्र राज्य, मुंबई,

१०) अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, मुंबई / ठाणे / रायगड / रत्नागिरी / सिंधुदूर्ग,

११) अधिक्षक, भुमी अभिलेख, मुंबई / ठाणे / पुणे / रायगड / रत्नागिरी / सिंधुदूर्ग,

१२) प्रांत अधिकारी ठाणे / भिवंडी व कल्याण / पुणे / रायगड / रत्नागिरी / सिंधुदूर्ग,

१३) महाव्यवस्थापक, भुमी व संर्वेक्षण, महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळ, मुंबई.